कामाच्या ठिकाणी महिलांचे लैगिक छळ (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम २०१३ मधील तरतूदीनुसार अंतर्गत तक्रार समितीची स्थापना करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७८/का.०१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०२०

वाचा:-

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१००३/३६/प्र.क्र.६/२००३ मकअ, दिनांक ०५.०१.२००४

२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग, क्रमांक मकचौ-२०१३/प्रक्र६३/मकक, दिनांक १९.०६.२०१४

३) कार्यालयीन आदेश आदिवासी विकास विभाग क्रमांक तक्रार-२०११/प्र.क्र.९१/का.१, दिनांक ११.०३.२०१५

४) कार्यालयीन आदेश आदिवासी विकास विभाग क्रमांक तक्रार-२०११/प्र.क्र.९१/का.१, दिनांक १६.०६.२०१६

५) कार्यालयीन आदेश आदिवासी विकास विभाग क्रमांक संकिर्ण २०१९/प्र.क्र.७८/का.१, दिनांक ०७.०५.२०१९

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाकडून कामाच्या ठिकाणी महिलांचे लैगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम दिनांक २३ एप्रिल, २०१३ व त्याअंतर्गत दिनांक ०९ डिसेंबर २०१३ रोजी नियम प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. त्यानुसार प्रत्येक कार्यालयात अंतर्गत तक्रार समिती स्थापन करण्याबाबत महिला व बाल विकास विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय निर्गमित केला आहे.त्यानुसार आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्रमांक ३, ४ व ५ येथील कार्यालयीन आदेशान्वये अंतर्गत तक्रार समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीमधील काही सदस्यांची सेवानिवृत्ती व इतर विभागात बदली झाली झाल्यामुळे सुधारीत अंतर्गत तक्रार समिती गठित करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

कामाच्या ठिकाणी महिलांचे लैगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम २०१३ अंतर्गत आदिवासी विकास विभाग (खुद्द) मध्ये खालीलप्रमाणे अंतर्गत तक्रार समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समितीमधील अध्यक्ष /सदस्यांची नांवे | पदनाम |
|---|---|---|
| १. | श्रीमती नंदिनी आवाडे, सह संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, २८ क्वीन्स गार्डन, पुणे- ४११ ००१ | अध्यक्ष |
| २. | श्री.सु.ना.शिंदे, उप सचिव | सदस्य |
| ३. | श्रीमती गजभिये, टाटा इन्सिट्यूट, ऑफ सोशल सायन्स, देवनार मुंबई | अशासकीय सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | श्रीमती इर्शत जहान, कार्यकारी संचालक, क्वेस्ट, कार्यालय | निमंत्रित सदस्य |
| ५. | श्रीमती शशिकला अहिरराव, उपआयुक्त, आयुक्त कार्यालय नाशिक | सदस्य |
| ६. | श्रीमती शैला मिठबावकर, कक्ष अधिकारी | सदस्य सचिव |

मंत्रालय, आयुक्त, आदिवासी विकास कार्यालय, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे, महाराष्ट्र राज्य आदिवासी सहकारी विकास महामंडळ, नाशिक, शबरी, आदिवासी वित्त आणि महा.मर्या, नाशिक येथे काम करणाऱ्या महिला कर्मचाऱ्यांना याव्दारे कळविण्यात येते की, त्यांनी लैगिक छळासंदर्भात कोणतीही तक्रार असल्यास ती अंतर्गत समितीच्या अध्यक्षा किंवा सदस्य सचिव किंवा अंतर्गत तक्रार समितीच्या नावे सादर करावी.

२. सदर महिला तक्रार समितीचे कामकाज पुढीलप्रमाणे चालेल:-

१. केंद्र शासनाने कामाच्या ठिकाणी महिलांचे लैगिक छळापासून संरक्षण ( प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम दिनांक २३ एप्रिल, २०१३ व त्याअंतर्गत दिनांक ०९ डिसेंबर २०१३ रोजी नियम प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. यामधील तरतूदीनुसार महिलांच्या लैगिक छळवणूकीस आळा घालण्यासाठी व कामाच्या ठिकाणी सुरक्षित वातावरण मिळावे यासाठी आवश्यक उपाययोजना करणे.
२. विभागाच्या स्तरावर प्राप्त झालेल्या तक्रारीचे निवारण निर्धारीत कालावधीमध्ये छाननी करणे व तक्रारींच्या अनुषंगाने योग्य त्या प्राधिकाऱ्याकडे पुढील कार्यवाहीसाठी प्रस्ताव सादर करणे.
३. लैगिक छळवणूकीसारखे प्रकार टाळण्यासाठी जागृती निर्माण करणे व तसेच समितीच्या नियतकालीक बैठका घेऊन सुरक्षित वातावरणाच्या निर्मितीबाबत खात्री करणे.
४. निर्णय घेण्यासाठी सदर समितीच्या सदस्यांपैकी किमान चार सदस्य उपस्थित राहणे आवश्यक आहे.
५. सदरहू अधिनियमातील तरतूदीनुसार वार्षिक अहवाल तयार करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२०५१३५८२६६७२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

Digitally signed by Shaila Ravindra Mithbavkar
Date: 2020.02.05 14:42:45 +05'30'

**( शैला मिठबावकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) श्रीमती नंदिनी आवाडे, सह संचालक, आदिवी संशोधन व प्रशिक्षण संस्था, २८ क्वीन्स गार्डन, पुणे- ४११ ००१ तथा अध्यक्षा, महिला तक्रार निवारण समिती, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) श्री. ल.गो.ढोके उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) श्रीमती गजभिये, टाटा इन्सिट्यूट, ऑफ सोशल सायन्स, देवनार मुंबई-८८
४) श्रीमती किशोरी गद्रे, कार्यकारी संचालक, क्वेस्ट कार्यालय, मुंबई
५) श्रीमती शशिकला अहिरराव, उपआयुक्त, आयुक्त, आदिवासी विकास कार्यालय, नाशिक

६) श्रीमती शैला मिठबावकर, सदस्य सचिव, महिला तक्रार निवारण समिती, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत माहितीसाठी**

१. आयुक्त, आदिवासी विकास कार्यालय, नाशिक
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, २८ क्वीन्स गार्डन, पुणे- ४११ ००१
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य आदिवासी सहकारी विकास महामंडळ, नाशिक,
४. व्यवस्थापकीय संचालक,शबरी, आदिवासी वित्त आणि महा.मर्या, नाशिक
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती.